October-November, 2019 | **Price**: ₹ **200/-** | **Total Pages**: 68

चिकूPiku.com
Fun & Learning




**For Parents & Kids**
(1 to 11 Years)

**Stories & Activities in मराठी & English Languages.**

# प्रिय आई-बाबा,

चिकूपिकूचा हा स्पेशल अंक. नेहमीचा अंक एक ते आठ या वयोगटासाठी असतो, तर हा अंक दहा-अकरा या वयोगटापर्यंतच्या मुलांसाठी आहे.

आलामंतर कोलामंतर छू...

असे शब्द ऐकले की आता नक्कीच काहीतरी जादुई चमत्कार घडणार असं आपल्याला वाटतं. तीच या अंकाची थीम आहे.

या अंकात वाचायला मिळतील अनेक गमतीदार गोष्टी. 'निळ्या आणि पिवळ्या' ही एक धमाल गोष्ट अंकामध्ये आहे. याशिवाय 'शेवाळलेलं कासव' घेऊन पेम्बा येतोय. आजीच्या लहानपणीची दिवाळी एन्जॉय करते आहे छबी. बर्फातिपण काहीतरी जादू असते हे सांगणारी फिशिरा आहे. फटाक्याचा आवाज सहन न होणारे प्राणी-पक्षी चिकूपिकूच्या गोष्टीत आहेत. क्यूबो बघा, काहीतरी विचारतोय. आणि टप्पूच्या घरात नक्की कोण राहतं? त्यासाठी हा एवढा मोठा गोष्टींचा खजिना तुमच्या भेटीला आला आहे!

मुलांना आवडतील अशा कविताही आहेत. त्या आम्हाला रेकॉर्ड करून पाठवाल का? मुलांनी रंगाची जादू अनुभवावी, हातांनी करून बघता येतील अशा चित्रांच्या छान कल्पना या अंकामध्ये आहेत. अंगठ्याच्या ठशांची चित्रं, हातांच्या आऊटलाईनची चित्रं -असं बरंच काही!



छोट्या मुलांना अंक वाचून दाखवा आणि वाचता येणाऱ्या मोठ्या मुलांना अंक वाचायला द्या. तुमच्या प्रतिक्रिया आमच्यापर्यंत नक्की पोहोचवा!

डॉ. श्रुती पानसे
**Editor - ChikuPiku**
**Ph.D. (Brain-Based Learning)**
**Educationist | Consultant**
**www.shrutipanse.com**

**Designed by team of ONE ZERO EIGHT Brandcomm Pvt. Ltd.**

---

**Owned & Published by** OneZeroEight Learning Pvt. Ltd. | **Editor**: Dr. Shruti Panse
**Printed by** Atharva Print Creation, S. No. 91/1, Plot No. 8, Tulshibaugwale Colony, Sahakar Nagar, Pune 411 009
**Published at** Flat No. 10, Narayan Complex, 2nd Floor, Hingne Kh., Sinhgad Road, Pune 411 051



# The Family That Plays Together, Stays Together...

- शोभा भागवत
लेखिका, संचालिका- गरवारे बालभवन

खेळातून तयार होणारं पालकांचं आणि मुलांचं नातं खूप महत्वाचं आहे. पालकांना जर मुलांशी काय खेळावं हे कळलं तर ते नातं अधिकच चांगलं होईल. पालकांना खेळ म्हटलं की असं वाटू शकतं की मैदानावर जाऊन खेळायचे खेळ. पण घरातसुध्दा पुष्कळ खेळ खेळता येतात. आणि ते लहान वयात आवश्यकही आहेत. एरवी बोलताना पालक-मुलांचे संवाद असे असतात, "बघ हं, अंघोळ केली नाहीस तर दाराबाहेर ठेवीन. पाच मिनिटांत जेवण संपलं नाही तर बक्षीस रद्द. नाही दात घासलेस तर रात्री झोपू देणार नाही, लक्षात ठेव." हे ताण-तणावाचे, शिस्तीचे संवाद कमी व्हायला खेळ मदत करतात.

पालक हल्ली त्यांच्या दिनक्रमानेच एवढे दमून जातात की मुलांसाठी काहीही करू म्हटलं की त्यांना ते जास्तीचं काम वाटतं. खेळ खेळून जर मूल प्रसन्न झालं, खुश झालं तर खेळताना खूप हसणारी आई, खुश होणारे बाबा, असं वातावरणच बदलेल. मूल कदाचित न कुरकुरता अभ्यास करेल, आनंदाने जेवेल. आई-बाबा आपली कामं उत्साहाने उरकतील. मग अशा कुटुंबाचं काम वाढलं का कमी झालं म्हणायचं?

१. एका मुठीत नाणं आणि एका मुठीत कागदाची पुडी ठेवली आणि मुलाला विचारलं "ओळख कुठल्या हातात काय आहे?" मूल एका हाताला हात लावून काहीतरी म्हणेल, बरोबर का चूक ते मूठ उघडल्यावरच कळेल. कधी शिताफीने दोन्ही वस्तू एकाच हातात आणि दुसरा हात मोकळाच असं करता येईल. मग मुलाच्या हातात त्या वस्तू देऊन "आता मला ओळखायला सांग" असं सांगता येईल.

२. कधी मुलाला म्हणता येईल की,"हा रुमाल घे. पण तो जादूचा आहे बरं का. मी तुझ्याकडे टाकला की त्याचा बॉल होईल. आणि तू माझ्याकडे टाकशील तेव्हा त्याचा पक्षी होईल. आता सुरु करूया आपण खेळ." खेळता-खेळता प्रत्येक वेळी त्या रुमालाचं रूप पालटेल. कधी त्याची छोटीशी मुलगी होईल, कधी त्याचं छोटसं मांजर होईल. कधी त्याचं अंडं होईल.

३. कधी वर्तमानपत्राचं पान घेऊन बसायचं आणि मुलीला सांगायचं, "याच्यामध्ये गोंधळ हा शब्द कुठे आहे सांग." ती शोधेल-शोधेल आणि अचानक तिला सापडेल. मग ती आपल्याला एखादा शब्द सांगेल आणि आपण तो शोधायचा.





४. कल्पनाशक्तीचा खेळ खेळता येईल. समजा 'हवा' हा विषय घेतला तर ज्याला जे सुचेल ते हवेबद्दलचं वाक्य त्याने म्हणायचं. कोणी म्हणेल हवा सगळीकडे असते. कोणी म्हणेल हवा थंड असते. कोणी म्हणेल कधी ती गरमपण असते. थंड हवेची ठिकाणं असतात पण उष्ण हवेची का नसतात? कधी-कधी आपली हवा टाईट असते. हवा झाडाची पानं हलवते. हवा कपडे वाळवते. थंड हवेने तेल गोठतं, पाण्याचा बर्फ होतो. हवा नसली तर आपण जगूच शकणार नाही. असं जे जे प्रत्येकाला सुचत जाईल ते ते बोलत गेलं तर हवेबद्दलची इतकी माहिती जमा होते.

५. स्वयंपाकघरात असलेले सारखे पेले लहान मूल ओळीने मांडेल, तिरके एकमेकांवर ठेवेल, त्यांच्या वेगवेगळ्या जोड्या करेल, एकात एक घालेल, एकावर एक रचना करेल. फक्त एका प्रकारच्या भांड्यांशी मुलं इतक्या विविध प्रकारे खेळू शकतात.

६. कणीक भिजवली की त्यातला एक छोटा गोळा मुलाला दिला की त्यातून ते काय-काय करुन बघतं. ताटल्या, वाट्या, गणपती आणि अशा ब-याच गोष्टी.

७. कधी काचेचे बाऊल्स घेऊन त्यात कमी जास्त पाणी घालून जलतरंग करता येईल. काड्यांनी किंवा चमच्यांनी ते हळूच वाजवलं तर त्यातून निर्माण होणा-या नादामुळे मुलं इतकी खुश होतात.

खेळांमध्ये विविधता आहे, विविध प्रकारे डोकं चालवण्याची मागणी आहे, प्रसन्नता आहे. यातून बौध्दिक विकासच होतो.

७-८ वर्षांचं असल्यापासून जर मूल दरवर्षी एक मैदानावरचा खेळ खेळायला शिकलं तर साधारण १५व्या वर्षी आपला खेळ कुठला हे मूल स्वतः ओळखू शकतं. डॉ. शारंगपाणी म्हणतात तसं- मुलाला खेळ निवडावा लागत नाही, खेळच मुलाला निवडतो. मूल तोपर्यंत बॅडमिंटन, टेबल टेनिस, क्रिकेट, फुटबॉल, नेटबॉल हे खेळलेलं असेल किंवा बुध्दिबळ खेळलेलं असेल. शहरात आपल्या घराजवळ जो खेळ खेळणं शक्य असतं तो आपला खेळ.

खेळाडू मूल प्रत्येक खेळातून ब-याच गोष्टी शिकत असतं. शिस्त शिकतं, नियम शिकतं, नियमित वेळेवर उठणं, वेळेच्या आधी पोहोचणं हे घडतं. खाण्यावरचा ताबाही मुलं सहज शिकतात. या सगळ्या गोष्टी मुलाच्या वयात येण्याच्या काळात जे हार्मोनल बदल होतात ते पेलायला त्याला मदत करतात.



# पेम्बा

## शेवाळलेलं कासव

डॉ. श्रुती पानसे

पेम्बाची शाळा पहाडावर एका टोकावर होती. रोज पेम्बा त्याच्या मित्र-मैत्रिणींसोबत रमत-गमत घरी यायचा. पण आज पेम्बा एकटाच पळत-पळत घरी येत होता.

**बट्टूचं आता काय होणार? बट्टूचं आता काय होणार?** असं म्हणत पेम्बा टेकडी उतरत होता.

बट्टू म्हणजे पेम्बाच्या शाळेतला एक मुलगा. शाळेतल्या टीचर तर म्हणायच्या, **बट्टू, तुझं नाव ना 'बडवू' असं असायला हवं होतं रे. सतत कोणाला ना कोणाला तरी बडवत असतोस तू! असं का वागतोस सगळ्यांशी? एक दिवस तुलाच कोणीतरी बडवेल. तेव्हा मात्र माझ्याकडे तक्रार घेऊन येऊ नकोस.**

बट्टू सगळ्यांना त्रास द्यायचा. सगळ्यांच्या खोड्या काढायचा. ते रडायला लागले की हा जोर जोरात हसायचा.



Audio story available on www.chikupiku.com/audio



पेम्बाचं घर जवळ आलं. झाडांमधून त्याला खालच्या बाजूला घराची लाल कौलं दिसायला लागली. एका झाडाखाली लहानसं तळं होतं.

पेम्बानं तळ्यात डोकावलं, कितीतरी कासवं तिथे डोकं हलवत बसली होती. ते बघून परत त्याला प्रश्न पडला, **'बापरे! बट्टूचं आता काय?'** तळ्याकडून खाली घराकडे तो वेगानंच निघाला.





घरी येऊन धप्पकन बाहेरच्या झोपाळ्यावर बसला. तिथेच दप्तर टाकलं. **हा कसला आवाज आला?, असं म्हणून आईने बागेतूनच त्याला हाक मारली.**

आई बागेत माती उकरायचं काम करत होती. बागेतल्या पाण्याच्या हौदाकडे तो गेला. तिथेही एक कासव मस्तपैकी ऊन खात बसलं होतं. पेम्बाला कासवं आवडतात.
पण कासव बघून परत त्याला बट्टू आठवला.

**'आई, तुला माहितीये का, कुंजीकडे एक खूप मोठी काठी आहे. ती जादूची काठी आहे.'**

**'हो? तुला कसं माहीत? तू पाहिलीस का?'**



पेम्बा म्हणाला, ''मी पाहिली नाही. पण तिनं सांगितलं. आज काय झालं, कुंजीला बट्टूने ढकलून दिलं. ती मातीत पडली. आधी खूप रडली. आणि नंतर बट्टूला म्हणाली, की तिच्याकडे एक जादूची काठी आहे. त्या काठीने ती कुणाला मारत नाही. फक्त पाठीवर जोरात टेकवते. तशी टेकवली की त्याचं जादूने शेवाळलेलं कासव होतं.'' आई आश्चर्यानं म्हणाली, ''माणसाचं कासव होतं? बापरे!'' पेम्बा म्हणाला, ''नुसतं कासव नाही शेवाळलेलं कासव.'' आई म्हणाली, ''शेवाळलेलं कासव! हे कोणी सांगितलं? कुंजीनी?''



पेम्बा म्हणाला, ''हो. मग. ती आता जाणारे बट्टूच्या घरी. त्याच्या पाठीवर जोरात काठी टेकवणार आणि मग बट्टूचं शेवाळलेलं कासव होणार. मग उद्या बट्टू कसा गं येणार शाळेत?''
आई म्हणाली, ''खूपच हुशार आहे की रे कुंजी! तिनं बट्टूला असं सांगितलं, हीच त्याच्यासाठी खूप मोट्ठी शिक्षा आहे बघ!''

## उद्या शाळेत काय दिसेल पेम्बाला?
# बट्टू की शेवाळलेलं कासव?







# बघ आणि बनव.



Hand-eye Co-ordination







डाळी आणि रंगीत कागदापासून बनवलेली ही पणती बघ. ही पणती बनवण्यासाठी चणा डाळ, मसूर डाळ आणि मूग डाळीचा वापर केला आहे. तू पण अशी पणती बनवून बघ बरं! (१) कागदाचा भाग बनवण्यासाठी चौकोनी आकाराचा रंगीत कागद घे. (२) आता संपूर्ण चौकोनाची अर्धा ते एक इंच उंचीची आलटून–पालटून घडी घाल. (३) मधोमध अजून एक घडी घालून दोन्ही बाजू चिकटवून टाक. (४) दोन्ही बाजू चिकटवल्यावर शेजारी दिसणारा आकार तयार होईल.





# निळ्या-पिवळ्या

प्रतिक्षा खासनीस



एक होता निळ्या, तो त्याच्या निळोबा नावाच्या कुटुंबासोबत राहायचा. या निळ्याला खूप सारे मित्र होते.



पण त्याचा सगळ्यात जवळचा मित्र होता पिवळ्या. हा पिवळ्या त्याच्या यलोबा नावाच्या कुटुंबासोबत रहायचा.





त्या दोघांना एकमेकांसोबत खेळायला, दंगा-मस्ती करायला खूप आवडायचं. ते आपल्या मित्रांसोबत लपाछपी, पकडा-पकडी आणि रिंगा-रिंगासुध्दा खेळायचे.





एक दिवस निळ्याची आई सामान
आणायला बाजारात चालली होती,
'मी येईपर्यंत घरीच थांब' आईने
त्याला बजावलं.



यलोबा निवास

तरीही पिवळ्यासोबत
खेळण्यासाठी तो
त्याच्या घरी गेला.

पण बघतो तो
काय, पिवळ्या
घरी नव्हताच.





निळ्याला खूप वाईट वाटलं. त्यानं पिवळ्याला सगळीकडे शोधलं, तो कुठेच दिसेना.

शेवटी घरी जाता-जाता रस्त्याच्या कडेला त्याला पिवळ्या दिसल्या. “पिवळ्याऽऽऽ” निळ्याने जोरात हाक मारली. ते एकमेकांच्या दिशेने धावत आले.





त्या आनंदात त्यांनी एकमेकांना इतकी घट्ट मिठी मारली की ते एकमेकांत मिसळून गेले.

आणि काय आश्चर्य, ते दोघेही हिरवे झाले.







आता ते दोघे एकत्र खेळायला लागले. ते बागेत गेले, घसरगुंडी खेळले...



पाईपमधून जोरजोरात पळाले.





Audio story available on www.chikupiku.com/audio

केशरी मैत्रिणीबरोबर डोंगरावर चढले, खूप खेळले. आता अंधार पडायला लागला, त्यामुळे त्यांनी घरी जायचं ठरवलं.







पण निळ्याच्या घरी गेल्यावर निळ्याचे आई-बाबा म्हणाले, अरे तू आमचा निळ्या नाहीयेस, तू तर झाडांसारखा हिरवा आहेस.



मग ते पिवळ्याच्या घरी गेले तर त्याचे आई-बाबा म्हणाले, तू कोण आहेस? तू आमचा पिवळ्या नाहीयेस.



हे ऐकून ते जोरजोरात रडायला लागले. पण रडताना त्यांच्या डोळ्यातून त्यांच्या रंगाचं पाणी यायला लागलं, त्यामुळे ते परत आधीसारखे झाले. आता आपण वेगळे झालो, आता आई-बाबा आपल्याला ओळखतील असं त्यांना वाटलं. त्यांनी पुन्हा घरी जायचं ठरवलं.

निळ्याच्या घरी गेल्यावर आता मात्र निळ्याच्या आई-बाबांनी त्याला ओळखलं, जवळ घेऊन त्याचा पापा घेतला. हे बघून पिवळ्यासुध्दा त्यांच्या जवळ आला. मग निळ्याच्या आई-बाबांनी त्याचाही पापा घेतला. पिवळ्याला जवळ घेतल्याबरोबर तेसुध्दा हिरवे झाले. आत्ता कुठे त्यांना कळलं मगाशी नेमकं काय घडलं ते.







मग निळ्याचे आई–बाबा पिवळ्याच्या घरी गेले. घडलेली सगळी गोष्ट समजल्यानंतर निळोबा आणि यलोबा कुटुंबाने एकमेकांना मिठ्या मारल्या,





आणि ते सगळे हिरवे झाले. आता निळ्या आणि पिवळ्या एकमेकांसोबत कायमचे खेळायला लागले






-आभा भागवत

# ५ दिवसांची ॲक्टीव्हिटी

साहित्य- दोन मोठे कार्डशीट आकाराचे कागद, पोस्टर कलर्स, मोठा ब्रश, लहान ब्रश, रंग कालवायला वाटी, ताट, स्वतःचे हात आणि पाय.

काय करायचं- तुझ्या स्वतःच्या आकाराहून मोठं चित्र आज काढायचं आहे. मोठा कागद भिंतीवर लावून त्यावर ओल्या रंगांनी आधी बॅकग्राऊंड रंगवायची, मग त्यावर पायाचे आणि हाताचे ठसे घेऊन जादुई चित्र करायचं.

## पालकांसाठी

आजच्या चित्रात मुलांना बरीच मदत लागेल. भिंतीवर दोन मोठे कार्डशीट आकाराचे कागद एकमेकांना जोडून चिकटवा. मुलांचा हात पोहोचेल एवढ्याच वरपर्यंत कागद चिकटवा. दिवाळीच्या सुट्टीत जास्त वेळ मिळेल म्हणून ही कलाकृती ४ ते ५ दिवस करायची आहे, हे ध्यानात घ्या. प्रत्येक दिवशी अर्धा ते एक तास एवढंच चित्र काढायचं आहे.

पोस्टर कलर्सचे मोठे २५०मि.ली. चे डबे पुढील रंगछटांमध्ये आणा - निळा, पांढरा, लाल, केशरी, पिवळा, फिका हिरवा, गडद हिरवा. याव्यतिरिक्त तुमच्या कल्पनेप्रमाणे रंगांची भर घालू शकता.



**दिवस १ -** निळ्या रंगात कमी-जास्त प्रमाणात पांढरा घालून चार छटा तयार करून घ्या. एकावेळी एकच छटा घेऊन ती कागदावर ब्रशाने रंगवायची. पूर्ण कागद या निळ्याच्या चारही छटांनी रंगवायला द्या. रंगवताना ज्या गंमती सुचतील त्या करण्याची पूर्ण मोकळीक मुलांना द्या.



**दिवस २ -** वाळलेल्या निळ्या बॅकग्राऊंडवर आज फक्त गडद हिरव्या रंगाने खालून वर रेघा काढायला सांगा. या रेघा म्हणजे फुलांची देठं असणार आहेत.







दिवस ३- आज ताटामध्ये हिरवे पिवळे रंग शेजारी-शेजारी घ्या. त्यात मुलाचा तळपाय बुडवून त्याचे ठसे पानांप्रमाणे देठाजवळ घ्या. प्रत्येक पान रंगांच्या वेगवेगळ्या रचनांचं होईल. हात रंगात बुडवले की रंग एकमेकांत मिसळतील, ती प्रक्रियाही सुंदर असते, मुलांना ती आनंदाने अनुभवू द्या.



दिवस ४ - आज ताटामध्ये लाल, केशरी आणि पिवळा रंग शेजारी-शेजारी ओतून घ्या. त्यात एका वेळी एक हात घालून फुलांच्या जागी ठसे घ्या. मुलांना दोन्ही हातांचे ठसे घेऊ द्या. फुलं कुठे असावीत हे तुम्ही सांगू नका, मुलांना विचारा.



दिवस ५ - लहान ब्रशने गडद हिरवा आणि लाल रंग घेऊन मुलांना फुलं आणि पानं रंगवायचा प्रयत्न करू दे. तुम्हीही यात मदत करा. त्यामुळे छोटीशी सावली तयार होऊन चित्र अजून खुलून येईल. हे चित्र अनेक दिवस, अनेक महिने, अनेक वर्षं टिकू शकेल. एक चित्र याप्रमाणे केल्यावर अजूनही चित्रं सुचतील, ती करून बघा.



**आवर्जून काय कराल?**

रंगांशी खेळता-खेळता तुम्हाला स्वतःलाच चित्र काढावं असं वाटलं तरी स्वतःला आवरा. हे चित्र मुलांनी अनुभवण्यावर लक्ष केंद्रित करा. रंगांची, मोठ्या आकाराची आणि सलग ४-५ दिवस एकाच चित्रावर काम करण्यातली जादू मुलांना आवडेल.



**काय करू नका?**

तुमच्या डोक्यातील चित्राची कल्पना मुलांवर लादू नका. रंग हातात आले की मुलांना नवे प्रयोग सुचतात, त्यांना थांबवू नका. त्यांना हवं ते करून बघू द्या.



# डिंगूची आयाळ

गीर नावाच्या जंगलात सिंहाचं एक पिल्लू त्याच्या आई-बाबांसोबत राहत होतं. त्याचं नाव डिंगू. एकदा डिंगू त्याच्या बाबांबरोबर नदीवर अंघोळीला गेला. आंघोळ झाल्यावर बाबांनी त्यांचे केस झट-झट झटकले. उन्हामध्ये केस मस्त चमकायला लागले.

डिंगू म्हणाला, **बाबा, मला कधी येणार तुझ्यासारखी आयाळ?**

त्यावर बाबा म्हणाला, **तू मोठा झालास की येईल.**

डिंगू म्हणाला, **मला फक्त एकदाच देशील का तुझी आयाळ? मी घालून बघतो आणि लगेच देतो. प्लीज, दे ना रे!**

त्यावर बाबा हसून म्हणाला, **अरे, डिंगूल्या. आयाळ काही निघत नाही. आयाळ म्हणजे केस. ते कसे मी तुला देऊ?**

ते ऐकून डिंगू उदास झाला.


Audio story available on www.chikupiku.com/audio



दुपारी डिंगू खेळायला बाहेर पडला. जांभळाच्या झाडाजवळ त्याला मंकू आजोबा भेटले. मंकू आजोबा जंगलातल्या सगळ्या प्राण्यांना मदत करायचे. डिंगू त्यांना म्हणाला....

**मंकूआजोबा, मला मदत कराल का? मला बाबासारखी आयाळ घालून बघायचीये.**

**तुझी इच्छा मी पूर्ण करीन. पण त्याआधी तुला दोन प्राण्यांना मदत करावी लागेल.**





बरं! म्हणून डिंगू पुढे निघाला. कोणाला बरं मदत करायची? असा विचार डिंगू करायला लागला. तेवढ्यात त्याला चिमू हरीण दिसलं. डिंगूला पाहून चिमू पळायला लागली. डिंगू म्हणाला...

**अगं, चिमू पळू नकोस. मी तुला काही करणार नाही. उलट मी तुला मदत करणारे. तुझी काही इच्छा असेल तर सांग ना.**



चिमू म्हणाली, **खरंच सांगूऽऽऽ? त्या डोंगराच्या पायथ्याशी मऊ-मऊ गवत आहे. मला किनई ते खायचंय. पण तिथे तो लब्बाड गब्बर लांडगा राहतो ना. त्यामुळे आम्ही हरणं तिथे जातच नाही. तू आणून देशील का मला तिथलं गवत?** डिंगू म्हणाला, **हो!!! आत्ता जातो आणि घेऊन येतो.** डिंगूनी चिमूला डोंगराच्या पायथ्याशी असलेलं गवत आणून दिलं. चिमू खुश झाली. गोड हसून म्हणाली...

**थँक्यू डिंगू... तुझ्यामुळे मला हे मऊ-मऊ गवत खायला मिळालं.**





चिमूला टाटा करून डिंगू पुढे निघाला. थोडं पुढं गेल्यावर त्याला एका झाडाखाली बल्लू अस्वल दिसलं. बल्लूकाकांना डिंगू म्हणाला, **काका तुम्हाला काही मदत हवीये का?** बल्लूकाका म्हणाले, **काय बरं मदत करशील मला? हं... माझी पाठ खूप खाजतीये. माझा हात काही तिथे पोहोचत नाही. तू खाजवून देशील का माझी पाठ?** डिंगू म्हणाला, **हो खाजवतो की... डिंगूनी त्याची नखं बाहेर काढली आणि बल्लूकाकांची पाठ खर-खर खाजवली.**
बल्लूकाका म्हणाले,

**आहाहाहाSSS मस्त-मस्त. किती बरं वाटतंय तू पाठ खाजवून दिल्यावर.**

बल्लूकाकांनी प्रेमाने डिंगूची पाठ थोपटली. बल्लूकाकांना टाटा करून डिंगू परत निघाला.

दुसऱ्या प्राण्यांना मदत करून त्याला आता मस्त वाटत होतं. हसत-हसत डिंगू मंकू आजोबांकडे आला. मंकूआजोबा म्हणाले, **काय डिंगूराव, कोणा-कोणाला मदत केलीस?** डिंगू म्हणाला. **चिमू आणि बल्लूकाकांना. त्यांना मदत करून मस्त वाटलं मला. आता मी रोज जंगलातल्या प्राण्यांना मदत करणार**. मंकूआजोबा म्हणाले, **चल आता तुझी इच्छा पूर्ण करतो. आधी डोळे बंद कर.**



मंकू आजोबांनी वाळलेल्या काडीचा गोल तयार केला. मग, सोनेरी वाळलेलं गवत घेतलं. गवत गोलाभोवती पिंजून लावलं. आणि तो गोल डिंगूच्या डोक्याभोवती लावला. मंकू आजोबा म्हणाले, **आता डोळे उघड आणि तळ्यातल्या पाण्यात बघ**. डिंगूनी डोळे उघडले आणि पाण्यात वाकून बघितलं. त्याला बाबांसारखीच आयाळ आली होती. डिंगू खूप खुश झाला. मंकू आजोबांना थँक्यू म्हणून डिंगू नाचत-नाचत घरी निघाला.











# HELP DINGU

Can you help Dingu to find his way to Manku?



Start



How many fruits did you collect for Manku on the way?



# वारेदादांची गंमत

**विद्याधर शुक्ल**



आज मनात वाऱ्याच्या आली थोडी लहर
उठली स्वारी चटकन मारायला चक्कर
खिडकीतून, दारातून झुळकन शिरला
दोरीवरचा रुमाल फड-फड करू लागला





टेबलवरचे कागद उडाले भर-भर
शेंगदाण्याची साले पसरली घरभर
भांडे पडले फळीवरून आवाज झाला मोठा
हॉलमधल्या पडद्यावर लाटांवर लाटा











मिनूताईचा फुगा उडवला लांब-लांब
मिनू फुग्यामागे धावे म्हणे, "थांब-थांब"
आई ओरडली "अहो, आधी दारे खिडक्या लावा
घरभर झाला पसारा, आता सगळा आवरून ठेवा"



टा टा करून मिनूला वारा हळूच सटकला
"इकडे कुठे वारेदादा?", झाडाने शेकहँड केला
करून गप्पा फांद्यांशी शेंडा हलवला थोडा
टप-टप टप-टप फुलांचा पडला सडा



निरोप घेतला झाडाचा बाय-बाय करून
वाटले वारेदादाला ढगाला येऊया भेटून
अगडबंब ढगोबांशी केली थोडी कुस्ती
ढग म्हणे "ये ना रोज, करू दंगा मस्ती"

गंमत-जंमत खोड्या करून वारेदादा दमले
सुळकन सूर मारून, गाढ डोंगरकुशीत झोपले








# आवाजाचा राक्षस!

वैशाली कार्लेकर

पिकू घाबरून उडत आली.

चिकूSSS चिकू, मला खूप भीती वाटतेय. कसला तरी मोठ्ठा आवाज आला. काहीतरी पडलं जोरात!



मला नाही आला आवाज. काय झालं?



अरे, मी तिकडे मैदानाजवळच्या झाडावर बसले होते ना, तेव्हा खूप मोठ्ठा आवाज आला. मी, चिऊताई, खारुताई सगळेच पळालो.

घाबरू नको. आता काही नाही होणार.





तेवढ्यात बाजूने पुन्हा फटाक्यांचा मोठा आवाज आला. चिकू, पिकू दोघेही घाबरले. चिकू आवाजाच्या विरुद्ध दिशेने जाऊन थांबला. पिकू पण दुसऱ्या झाडावर जाऊन बसली.



बापरे, इकडेपण आला तो
**आवाजाचा मोठा राक्षस!**
आता काय करायचं?

मला खूप भीती वाटतेय.
आपण खूप लांब पळून
जाऊया.





पण कुठे जायचं?
तिकडे पण तो आवाजाचा
राक्षस आला तर?

तेवढ्यात बाकीचे काही पक्षी तिथे उडत आले.
तीन-चार कुत्री पण आली.
सगळे घाबरून लपायला जागा शोधत होते.

Audio story available on
www.chikupiku.com/audio





तेवढ्यात मिकू आणि तिचे मित्र-मैत्रिणी तिथे फटाके घेऊन आले. त्यातल्या एकाने तिथेच फटाका वाजवला. मोठ्ठा आवाज झाला. चिकू, पिकू आणि इतर प्राणी-पक्षी घाबरुन ओरडायला लागले.



मिकूच्या लक्षात आलं की हे काहीतरी वेगळं चाललं आहे. तिने चिकू, पिकूला बोलावलं. पण दोघंही आले नाहीत. मग मिकूला कळलं की ते फटाक्यांना घाबरले आहेत. ती मित्रमैत्रिणींना सांगते की...

फटाक्यांच्या आवाजामुळे प्राणी-पक्ष्यांना खूप त्रास होतोय. चिकू तर खूपच घाबरलाय. तो माझ्याजवळसुद्धा येत नाहीये.

हो ना. आमची मनीसुद्धा फार घाबरलीये. आणि घरी पलंगाखाली लपून बसलीये.

मग मिकू आणि तिच्या मित्र-मैत्रिणींनी ठरवलं की आपण मोठा आवाज करणारे फटाके नको वाजवायला.

धम-धुडुम फटाके फुटले
चिकू-पिकू घाबरून गेले
मिकू म्हणाली, आवाज नको फुलबाजी उडवू,
चिकू पिकूची दिवाळीसुद्धा आनंदी करू.

रांगोळीत एकूण किती गोल आहेत मोजून लिही. 



# इंदूचा पेटारा

मित्रांनो, माझं नाव इंदू. माझ्याकडे किनई एक जादूचा पेटारा आहे. कोणाला काही वस्तू हवी असेल तर ते लगेच मला बोलवतात. मग मी माझ्या जादूच्या पेटाऱ्यातून ती वस्तू काढून त्यांना देते. तू माझ्या घरातल्या लोकांना काय-काय वस्तू हव्या आहेत त्या माझ्या पेटाऱ्यातून शोधून दे. आणि त्या वस्तूचे नाव लिही.



इंदूच्या अम्माला वरण ढवळायचं आहे. इंदूच्या पेटाऱ्यातील कोणती वस्तू अम्माला उपयोगी पडेल?



इंदूच्या तातांना म्हणजे आजोबांना चष्मा सापडतच नाहीये. त्यांना पेपर वाचायचाय. तू पेटाऱ्यातली कोणती वस्तू तातांना देशील बरं?



पाटिमाला म्हणजे आजीला किटलीत तेल ओतायचंय. इंदूच्या पेटाऱ्यातील कोणती वस्तू पाटिमाला देता येईल?



आप्पांना माळ्यावरून बॅग काढायची आहे. पण माळ्यावर खूप अंधार आहे. तू त्यांना कोणती वस्तू देशील?





# जादूई स्कार्फ

लेखक– फारुख एस काझी
चित्रं – शैलजा जैन चौगुले

**जपानमधील** एका छोट्याशा गावातील ही गोष्ट. त्या गावात एक म्हातारी राहत असे. ती खूप प्रेमळ आणि सर्वांना मदत करणारी होती. ती रोज सकाळी उठून तयार होई. गावाबाहेरील बुद्ध मंदिरात जाऊन ध्यानधारणा करीत असे. हा तिचा नित्यक्रम सुरु होता.

एकदा सकाळी ती अशीच मंदिराच्या आवारात गेली. तेव्हा तिला तिथं झाडाखाली एक **स्कार्फ** पडलेला दिसला. हिरव्या रंगाचा आणि झाडं, वेली, पानं, फुलं, प्राणी, पक्षी यांचं कशिदाकाम केलेला. म्हातारीने तो स्कार्फ हातात घेतला. किती मऊ–मऊ आणि उबदार.

''हे तथागता, तू मला किती अनमोल भेट दिलीस! तुला खूप–खूप धन्यवाद!'' आता सकाळी तिच्या कानांना थंडी लागणार नव्हती. तिने तो स्कार्फ आपल्या डोक्याला गुंडाळला. चाचपून पाहिला. शेजारच्या पाण्याच्या दगडी हौदात डोकावून पाहिलं. **''किती सुंदर दिसतोय हा स्कार्फ!''** ती गालातल्या गालात हसली.

इतक्यात तिला कुणाच्या तरी कुजबुजण्याचा आवाज आला. तिने सगळीकडे पाहिलं. परंतु तिला कोणीच दिसलं नाही. मंदिराच्या आवारात कोणीच बोलत नसे. मग कोण कुजबुजत होतं?







तिने मान वर करून पाहिलं. आवारातल्या झाडाच्या फांदीवर दोन कावळे एकमेकांशी बोलत होते. **''मला काल रात्रभर झोप लागली नाही.'' पहिला कावळा म्हणाला, ''का?, काय झालं?''**

**दुसरा कावळा म्हणाला, ''काल रात्रभर ते चेरीचं झाड रडत होतं. गाव प्रमुखांनी स्वत:च्या हॉटेलसाठी ते झाड तोडलं. पण, त्याची मुळं मात्र जमिनीतच राहिली. ते झाड ना धड मेलं, ना धड जिवंत आहे. ते सतत रडतंय.''**

कावळा बोलता–बोलता थांबला. आवंढा गिळून पुन्हा बोलू लागला. **''गावप्रमुख त्या दिवसापासून आजारी आहेत. जोवर तो त्या चेरीच्या झाडाला पुन्हा वाढवणार नाही तोवर तो बरा होणार नाही. तोही मरून जाईल.''**





हे सर्व ऐकून म्हातारी उदास झाली. रडणाऱ्या चेरीचं दु:ख तिला सहन झालं नाही. तिने मनाशी एक निश्चय केला आणि ती घरी परत आली. तिच्या हे लक्षात आलं होतं की **''स्कार्फमुळे आपण प्राणी, पक्षी, फुलं, पानं, झाडं यांना ऐकू शकतो. हा जादुई स्कार्फ आहे.''** म्हातारी बाई दुसऱ्याच दिवशी गावप्रमुखांच्या घरी जाऊन त्यांच्या बायकोला भेटली.

''मला तुमच्या नवऱ्याच्या आजाराचा इलाज माहीत आहे. मी स्वत: डॉक्टर आहे.'' गावप्रमुखाची बायको खूप उदास होती. तिने म्हाताऱ्या बाईला आत बोलावलं. चहा दिला.

म्हातारीने विचारलं, ''तुम्ही हे हॉटेल कधीपासून सुरु केले?''

गावप्रमुखाची बायको म्हणाली, ''सहा महिने झाले. आणि तेव्हापासूनच यांची तब्येत बिघडून गेली. कित्येक डॉक्टर, वैद्य, हकीम झाले. पण आजार काही कमी झाला नाही. उलट वाढतच गेला.'' असं म्हणून ती रडू लागली.

म्हातारी म्हणाली, ''रडू नका. मला सांगा, तुम्ही हे हॉटेल बांधताना इथं असलेलं एक सुंदर चेरीचं झाड तोडलं होतं का?''

''हो. तोडलं होतं.'' डोळे पुसत-पुसत त्या बोलल्या.





म्हातारी म्हणाली, '' मला ती जागा दाखवता का?''

गावप्रमुखाची बायको म्हणाली, ''हो, चला. या माझ्यासोबत.''

गावप्रमुखाची बायको आणि म्हातारी बाई दोघी हॉटेलात आल्या.

''या इथं होतं ते झाड.'' एका जागेकडे बोट दाखवून गावप्रमुखाची बायको म्हणाली.

म्हातारीने जमिनीला कान लावून ऐकलं. जमिनीतून आवाज येत होता.

''मी मरतोय. मला वाचवा. मी मरतोय.'' म्हाताऱ्या बाईला खूप दु:खं झालं.

तिथंच एक **निळं फुलपाखरू** घिरट्या घालत होतं.

''तू मरू नकोस. तुला कुणी ना कुणी वाचवेल. तू मरू नकोस. तू पुन्हा बहरशील.''

''मी पुन्हा-पुन्हा येईन तुझ्या फांदीवर बसायला.'' अशी विनवणी ते झाडाला करत होतं.

म्हाताऱ्या बाईला गलबलून आलं. तिने ठाम स्वरात बोलायला सुरवात केली. तिच्या आवाजात रागही होता, चीडही होती आणि वेदनाही. **''आधी हे हॉटेल काढून टाका. आणि खाली दबलेल्या चेरीच्या झाडाला पुन्हा मोठं करा. हाच तुमच्या नवऱ्याच्या आजारावर एकमेव उपाय आहे. त्याचं आजारपण हे त्या चेरीच्या झाडाचं दु:ख आहे.''**

गावप्रमुखाने हे ऐकलं आणि त्याने नोकरांना हॉटेल काढून टाकण्याचा आदेश दिला. नोकरांनी हॉटेल काढून टाकलं. जमीन खोदली आणि चेरीच्या झाडाचं खोड दिसू लागलं.



गावप्रमुखाने स्वत: त्याचं जतन करायला सुरवात केली. स्वत:च्या मुलासारखी तो झाडाची काळजी घेऊ लागला.

लवकरच त्याला कोंब फुटले आणि हळू-हळू झाड बहरू लागलं. तसा गावप्रमुखाचा आजार दूर होऊ लागला. पाहता-पाहता तो पूर्ण बरा झाला. त्याने म्हाताऱ्या बाईला खूप सारा पैसा बक्षीस म्हणून दिला. म्हातारी बाई आपला स्कार्फ घेऊन इतर गरजूंना मदत करायला निघून गेली. चेरीचं झाड आणि गावप्रमुख तिला मनापासून धन्यवाद देत होते.

Audio story available on
www.chikupiku.com/audio










१) कधी छोटं, कधी मोठं, कधी हिरवं, कधी पिवळं
खाताच अंगात येतं बळ, हत्तीचं खूप आवडतं फळ
वसई असो वा जळगावी, साल मात्र रस्त्यावर टाकायची नाही.
ओळखा कोण? ..........................................

२) फुलांवर बसते पण फुलपाखरू नाही, गोड आवडतं पण मुंगी नाही
झाडावर घर बांधते पण पक्षी नाही, गाणं म्हणते पण गवई नाही
चावते जेवढी चटकन, सूज येते पटकन. ओळखा कोण? ..............................

## छबी, क्यूबो आणि चिकूला त्यांच्या आवडीच्या वस्तूपर्यंत पोहोचण्यास मदत कर बरं!






आपल्या हाताने एखादं खेळणं बनवणं आणि ते खेळणं चालणं यातून मिळणारा आनंद अवर्णनीय आहे. तो पालकांनी मुलांसोबत अनुभवा. खेळणी तयार करायला मोठ्यांची मदत लागणार आहेच. पण हे छानच ना! ही खेळणी पहिल्या प्रयत्नात यशस्वी न होवो हीच इच्छा कारण मग ती दुरुस्त करण्यातून शिकण्याची उत्तम संधी मिळेल.

डॉ. विदुला म्हैसकर

## मॅजिक कार्ड



साहित्य: एक थोडा जाड कागद, डिंक, ट्रान्सपरंट शीट, चिकटपट्टी, स्केचपेन, सीडी मार्कर (काळा), रंगीत पेन्सिली, कात्री किंवा कटर




आयताकृती पांढरा जाड कागद घे.




कागद मधोमध दुमडून ज्या बाजूने टोक जुळणार आहे त्या बाजूने खालून अर्धा इंच जागा सोड.




कागदाच्या वरच्या बाजूला पेन्सिलीने चित्रात दाखवल्याप्रमाणे आयताकृती खिडकी काढ.




5



खिडकीचा आकार कटर किंवा कात्रीने काप. आणि त्याला आतून ट्रान्सपरंट शीट चिकटव.

6



आतील बाजूस पेन्सिलीने चित्र काढ.

7



आता ट्रान्सपरंट कागदावर आतील बाजूस काढलेले चित्रं सीडी मार्करने ट्रेस कर.

8



रंगीत पेन्सिलींनी आतील भागात काढलेले चित्रं रंगव.

9




डिंकाने अर्धा इंच सोडलेला खालचा भाग मागे चिकटव. आता भेटकार्डात मावेल एवढा पांढऱ्या कागदाचा तुकडा मधे सरकव. तुमचं मॅजिक कार्ड तयार झालं.



# फटाका



साहित्य: जुन्या वहीचा पुठ्ठा, पांढरा कागद, कात्री, छोटा रबर बँड, डिंक, स्केच पेन.

1



पुठ्ठ्यापासून अंदाजे ४ सेंटीमीटर लांब व ५ सेंटीमीटर उंचीचे २ समान तुकडे काप.

2



दोन्ही तुकड्यांच्या दोन्ही बाजूस मधोमध छोट्या त्रिकोणी आकाराच्या खाचा कर. एका बाजूला पांढरा कागद चिकटवून त्यावर फटक्याचे चित्र काढ

3



दोन्ही तुकडे एकावर एक ठेवून खाचेत रबर बँड अडकव.

4



लांबीच्या बाजूने पुढे विलग करून उलटे करून धरून ठेव.

5



मग एकदम सोड. फट् असा आवाज करत पुढे मूळ स्थितीत येतील.





# अंगूठा छाप

सौजन्य - अरविंद गुप्ता









अंगूठे के अंदर
छिपा एक बंदर
उसका एक साथी
मोटा एक हाथी।





तू पण तुझ्या अंगठ्याच्या ठश्यांनी अशी चित्रं काढून बघ.





# Curious CUBO

## Real Goddess

Prajaktta Kapure

Cubo is celebrating his Diwali at her grandparent's village. Cubo's mother has brought lots of gifts and sweets for Cubo's cousins. Cubo is really excited to celebrate Diwali.

Today is Vasubaras. The first day of Diwali. Cubo's mother, Kaku and Aaji worshipped embellished cow and her calf. They offered Naivaidya to cow and the calf. Cubo asked his Hrishi uncle.

Kaka, why should we worship the cow?

We worship her, because she is the goddess.



Audio story available on www.chikupiku.com/audio







But it's an animal. Goddess takes care of us. And helps us by magical power.



Cow does exactly the same, Cubo. Come, I will show you how.

**Cubo's Kaka takes him to a cowshed.**



See Cubo, this where cows live. Every morning these cows give us sweet, tasty, and healthy milk.

Kaka, I have seen a picture of the cow on the milk pockets we get every morning. This is great to see it in real.



We also send milk to milk collection centres and dairy. All milk products like Curd, Ghee, Butter, Khoya are made out of milk.



**Cubo sees a woman collecting cow dung.**



"Why is the lady collecting cow dung?"



**Kaka takes him to a Gober Gas Plant.**

Cubo, this is a Gober Gas Plant. This plant generates energy gas from cow dung. We use it for cooking in the kitchen. Cow dung is also used as a manure in farming. The way she helps us is magical .

Now I understood, Kaka.
The cow is a loving animal.
She gives us so much.
That's why we worship her.
Cows are a real goddess.





# ओळख पाहू आम्ही कोण?

खाली काही प्राण्यांच्या पावलांच्या खुणा आणि त्यांची सावली दिली आहे. पाऊलांच्या खुणा कुठल्या प्राण्याच्या असतील त्यानुसार त्यांच्या जोड्या जुळव.











# Picture from Letter

Draw pictures from letters and numbers















Nature and मी

# आपल्या घरात राहतंय कोण?

**Dharmaraj Patil**
(Ornithologist / Wildlife Researcher)

**हा आहे टप्पू. टप्पूच्या घरी त्याच्या आजोबांचे मित्र आले होते. त्यांनी टप्पूला एक चॉकलेट देत विचारलं,**

मग टप्पू, कोण-कोण राहतं रे तुमच्या घरी?

मी, आई-बाबा आणि आजी-आबा.

**टप्पू चॉकलेट खायला लागला.**
**तितक्यात टप्पूला एक छोटा आवाज ऐकू आला.**
**''शूक-शूक. कुठून आवाज येतोय?''**
**''अरे टप्पू इथे. खाली बघ.''**
**हळू आवाजात कोणी तरी बोलत होतं.**
**टप्पूनं खाली वाकून बघितलं तर एक मुंगी होती.**

मला विसरलास का?
मी पण राहते की तुझ्या घरात.

हे बघ, या बिळातून आत आमचं घर आहे.
तू चॉकलेटचा तुकडा खाली पाडलास.
या दोन अँन्टेनांनी मला चॉकलेटचा
वास आला. म्हणून लगेच इथे आले.
आमच्या अंगातून फेरोमोन्स
नावाचं केमिकल बाहेर येतं.
बिळापासून इथपर्यंत
मी वाटेत ते केमिकल
सोडत आलीये.
त्याचा वास घेत-घेत
माझ्या मुंग्या-मैत्रिणी
इथे येतील बघ आता.

पण तुम्ही किती
जोरात चावता गं?
त्या दिवशी बागेत मला
एक मुंगी चावली होती.

आम्ही कसे चावणार? आम्हाला दातच नसतात.
हं, पण आम्हाला धोका वाटला तर आम्ही
फॉर्मिक नावाचं ॲसिड सोडतो.
ते झोंबलं असेल तुला.

**तेवढ्यात टप्पूला अजून कोणीतरी हाक मारली.
टप्पूनी वळून पाहिलं. त्याला कोणीच दिसलं नाही.**

टप्पूला परत आवाज आला.

अरे, इथे कोपऱ्यात बघ. मी पण राहतो तुझ्या घरात. या कोपऱ्यात मी माझं जाळ विणलंय. माझ्या जाळ्यांनीच मी शिकार करतो. किडे, कीटक, डास या जाळ्यात अडकतात आणि मी ते खातो. मी मुळीच विषारी नसतो.

खरंतर मी हे घर किड्यांपासून सुरक्षित ठेवतो. माझ्या जाळ्याचा हा धागा पाहिलास? एवढ्याच जाडीच्या स्टीलच्या धाग्यापेक्षा माझ्या जाळ्याचा धागा मजबूत असतो.





**आता चुऽऽचुऽऽचु. असा आवाज टप्पूला आला. आवाज वरून येत होता. त्याने मान वर करून बघितलं तर एक पाल होती. पालीला पाहून टप्पू घाबरला.**



अरे टप्पू, घाबरू नकोस.
मी काहीही करत नाही.

उलट मीसुद्धा किडे खाऊन घर सुरक्षित ठेवते. माझ्या पायाचे तळवे चिकट असतात. त्यामुळे मी भिंतीवरून, छतावरून चालू शकते. माझी गंमत माहितीये नं तुला? मला कोणी मारलं किंवा त्रास दिला तर झटकन मी माझी शेपूट शरीरापासून तोडून टाकते. आणि पळून जाते. काही दिवसांनी पुन्हा नवी शेपूट येते.



**टप्पूला त्याच्याच घरात राहणाऱ्या या प्राण्यांना भेटून खूप गंमत वाटली. तो आजोबांकडे गेला आणि म्हणाला. आजोबा, आमच्या घरात मुंग्या, कोळी, पाल आणि हो झुरळसुद्धा राहतं. हे ऐकून सगळे खूप हसले.**




# छोटी आजी



Audio story available on www.chikupiku.com/audio

दिवाळीचे दिवस होते. छबीची आजी आज करंज्या करणार होती.

छबी आजीला म्हणाली, **''आजी...आजी, मी पहिली गरम-गरम करंजी खाणार!''**

आजी हसत म्हणली, **''मी पण तुझ्याएवढी लहान होते तेव्हा पहिली करंजी खायचा हट्ट करायचे. धमाल करायचो आम्ही वाड्यातली सगळी मुलं!''**

छबी म्हणाली, **''आजी, तुझ्या लहानपणी मीपण असते तर! कित्ती मज्जा केली असती ना आपण?''**

आजी खूप-खूप हसली, आणि म्हणाली,

**पण आता काही मला लहान होता येणार नाही. हे घे, करंजी खा!**

हाहाहा!!!



छबी करंजी घेऊन गेली थेट बागुलबुवाकडे.
अर्धी करंजी बागुलबुवाला दिली.

बागुलबुवा खुश होऊन म्हणाला,
**''झकास झालीये करंजी.''**

छबी म्हणाली, **''आजीने केलीय....
कशी दिसत असेल रे ती
लहानपणी?''**

बागुलबुवा म्हणाला, **''बघायचंय
का तुला? मी माझ्या जादूच्या
पिशवीतून पाठवू शकतो तुला
लहानपणीच्या आजीकडे?''**

छबी आश्चर्याने म्हणाली,
**''काऽऽऽय? आजीच्या
लहानपणी? मला जायचंय...**



**प्लीज.... पाठव ना मला.''**



बागुलबुवा म्हणाला, **''पण एक लक्षात ठेव,
चार तासांनी जादू संपेल आणि तू आपोआप परत घरी येशील.''**

छबी म्हणाली, **''हो-हो चालेल मला.''**

बागुलबुवा म्हणाला, **''आणि अजून एक, आजीच्या घरी गेल्यावर
तुला पहिल्यांदा जी लहान मुलगी दिसेल ती तुझी आजी, बरं का?''**

मग बागुलबुवानं जादूचा मंत्र म्हटला,

**''चिंग चिंग चूऽऽऽ चिंग चिंग चू...
आजीच्या घरात जाशील तू...''**





पिशवीतून मोठा प्रकाश आला आणि छबी थेट आजीच्या घराबाहेर पोहोचली आणि म्हणाली, ''वा... खरंच आले की काय मी आजीच्या घरी? बागुलबुवापण कसला भारी आहे!!!''

आजीचं घर छोटसं आणि छानसं होतं. आजूबाजूलापण तशीच बसकी घरं होती. उंचच-उंच घरं तिथे मुळीच नव्हती.

छबी सरळ आत आली. अंगणात तिला एक लहान मुलगी दिसली. तीच होती छबीची आजी. छोटया आजीनं खणाचं परकर पोलकं घातलं होतं. दोन वेण्या घातल्या होत्या आणि त्याला लाल रिबिनी बांधल्या होत्या.




छबी तिच्याजवळ गेली आणि म्हणाली,
**''आजी, हे काय करतीयेस तू?''**

छोटी आजी म्हणाली, **''आजी? आजी का म्हणतेस मला? माझं नाव सुमन आहे. बाबी म्हणतात मला सगळे. आजी मागे विहिरीपाशी असेल बघ. पण तू कोण गं? शहरातून आलीस वाटतं?''**

छबी जीभ चावून म्हणते, **''सॉरी-सॉरी. चुकून आजी म्हटलं. माझं नाव छबी. मी पुण्यात राहते. थोड्या वेळासाठीच आलीये इकडे. आपण एकत्र खेळूयात का?''**






छोटी आजी म्हणती, **होऽऽऽ खेळूया की. पण आधी मला शेणानी अंगण सारवून घेऊ दे. नाहीतर आई ओरडेल.**

छबीच्या मनात आलं, **अरे हो, आजीनी सांगितलं होतं, की ती शेणाने अंगण सारवायची... असं सारवतात होय अंगण?**

तेवढ्यात छोट्या आजीच्या मैत्रिणी सुमी आणि कुमुद तिथे आल्या. छोट्या आजीचं पण आता शेणाने अंगण सारवून झालं होतं. मग त्या सगळ्याजणी खेळायला निघाल्या.



त्या सगळ्या मिळून लगोरी, सागरगोटे, वडाच्या झाडावर सूर-पारंब्या खेळल्या. झाडावर खेळण्याची सवय नसल्यामुळे छबीला थोडं खरचटलं. पण तिने तिकडे लक्षच दिलं नाही. चिंचेच्या मोठ्या झाडाच्या चिंचा पाडून सगळ्या जणींनी खाल्ल्या.



मग छबी सगळयांबरोबर गावातल्या नदीवर गेली. आजी आणि तिच्या मैत्रिणींनी पाण्यावर दगड फेकले. छोटी आजी म्हणाली, ''**या बघ, भाकऱ्या. तो दगड टप टप टप असे बरोबर तीन टप्पे खाऊन पाण्यात पडतो.**''



संध्याकाळी छबी आणि छोट्या आजीने दारात रांगोळी काढली आणि घराच्या अंगणात, खिडकीत, दारात खूप साऱ्या पणत्या लावल्या.

आता अंधार पडला. छबी म्हणाली, ''**बापरे इतक्या लवकर चार तास संपलेसुद्धा!! बाबी, मी घरी जाते .**'' छोट्या आजीला वाईट वाटलं, ती म्हणाली, ''**आता कधी भेटशील गं परत?**''

एवढ्यात जादू संपली आणि छबी थेट घरी पोहोचली. छबी आजीला जाऊन चिकटली. म्हणाली, ''**अगं माझी बाबी... तुला सगळे लहानपणी लाडानं बाबी म्हणायचे का गं?**''

''**हो गं, पण तुला कोणी सांगितलं?.. आणि हे काय? केवढं खरचटलं हे?**''
छबी म्हणाली, ''**आपणच नव्हतो गेलो का तिथे त्या झाडांवर?...**''
छबी हसायला लागली....
पण आजीला काही म्हणजे काही कळलं नाही. बागुलबुवाला मात्र सगळं-सगळं माहित होतं.






# मजेदार हात!

-आभा भागवत

हाताची बाह्यरेखा वापरून तयार केलेले हे हरणाचे चित्र रंगव.
तू पण स्वतःच्या हाताची बाह्यरेखा वापरून चित्र काढून बघ बरं.

# Dreaming Duckling

Rajiv Tambe

**There** was a deep green forest. In the deep green forest was a dark blue pond. The dark blue pond had white and clean ducks. On the bank of the pond were very bright white cranes. The flock of ducks was paddling on the deep blue pond. But while paddling, the raft never even went near the cranes.



There was a different kind of duckling in the raft. Its name was **Duckey**.





One day Duckey saw the flock of cranes fly like woven pearls. When he saw the cranes fly.

Duckey thought, **'we also have wings like the cranes. Then Why can't we fly like those cranes? What is the use of these wings? Cranes can fly and they can also walk on water. But I am just stuck in this dumb pond.'**

**if I were a crane then it would be so much more fun...!!!**

**While he was thinking about it. Some magic happened and he really turned into "a crane."**



He liked his changed body very much. He liked the long beak, the long legs. Bright white colour and a bendy long neck.

He wouldn't have to bend down any more; his neck was long enough to reach anywhere.



Duckey was extremely happy with himself. He wanted to tell his friends and family about this change. So, he went near them and opened his mouth. He started shouting for them. He was stretching his legs and shouting in weird ways, and as soon as the ducks saw him they started running away. Some went near the bush and started shouting.

Some started splashing water in the pond.

All the ducks made chaos!!





Duckey - the new crane was now sad and went to the bank of the pond. Every other crane stepped away from the new one.

The new crane was all alone at the side of the pond.



**Audio story available on www.chikupiku.com/audio**





Now that he was a crane he couldn't swim. He could not play with his old friends. He couldn't even go near his mother. He was feeling very sad. The duckling thought, **'Forget about being a crane, and about changing personalities. Being a duck is way better.'**



**Within a fraction of seconds once again magic happened and he turned back to the old duckling again!!**

Duckey was happy this time! He paddled to his mother. He was about to tell his mother the whole story... When his mother said, Duckey where were you for so long? I looked for you everywhere. Stay alarmed okay! One crazy crane wanted to catch us. And when we made chaos, he ran away." Duckey heard this, laughed and hugged his mother. Mother never understood why Duckey laughed!

कोणीतरी वाघोबाच्या अर्ध्या अंगावरचे पट्टेच गायब केले आहेत. बिचारा वाघोबा खूप घाबरुन गेलाय. आता सगळे मित्र त्याला चिडवतील अशी भीती त्याला वाटतीये. त्याच्या अंगावर पट्टे काढून त्याला रंगव बरं.

# Draw with Circles, Square & Triangles









इथे दिलेल्या चिमणीप्रमाणे तू पण गोल, चौकोन आणि त्रिकोणापासून एखादं चित्र काढ.

भुर्रकन उडून आली चिऊ, चोचीने टिपला सारा खाऊ
वरुन ओरडला पोपटभाऊ, माझा दाणा नको घेऊ
इतक्यात आली हळूच माऊ, चिऊ म्हणाली उडून जाऊ

\- सौ. जयश्री एडगांवकर







# फिशिरा

## जादूचा बर्फ

डॉ. श्रुती पानसे

फिशिरा आणि मित्र-मैत्रिणी पकडा-पकडी खेळत होते. तेवढ्यात ऑक्टी कशाला तरी धडकला आणि त्याने एकदम उडीच मारली.


Audio story available on www.chikupiku.com/audio

कसली विचित्र उडी मारलीस रे ऑक्टी.

अगं, मी कशाला तरी धडकलो जोरात!!

काहीही सांगतो हां, पाण्यात असे धडकतो का कधी?





आणि इथे दगड किंवा
प्रवाळसुद्धा नाहीये.

पण खरंच तिथे काहीतरी होतं.
तुमच्या पोहण्याच्या रस्त्यात
असं काहीतरी येईल ना,
तेव्हाच कळेल तुम्हाला.

**(सगळे मित्र-मैत्रिणी ऑक्टीला हसतात. तितक्यात फिशिराचे बाबा येतात.)**

काय झालं रे?

बाबा, हा ऑक्टी म्हणतोय,
तो कशाला तरी धडकला.
पण इथे तर फक्त पाणी आहे.

पण तिथे काही होतं का?
की जे तुम्हाला कोणालाच
दिसत नाहीये?

म्हणजे अदृश्य? आम्हाला दिसत नव्हतं पण तिथे होतं म्हणजे काय? जादूऽऽऽ?

अरे तिथल्या पाण्याचा बर्फ व्हायला सुरुवात झालीये.

बर्फ?
बर्फ म्हणजे काय?

म्हणजे तिथे काहीतरी होतं ना? उगाच हसतात मला आणि चिडवतातसुद्धा.

आतापर्यंत उन्हाळा होता त्यामुळे तुम्ही पाण्यात मस्त पोहायचात. कुठेही जाऊ शकायचात. पण आता हळू-हळू हिवाळा सुरू होतोय. थंडी वाढत जाणार आणि पाण्याचा बर्फ होणार. बर्फ होणार म्हणजे पाणी घट्ट होणार.

असं कसं होतं?
जादूने?

हाहाहाऽऽऽ
हो! जादूने होतं.

सगळे मिळून जादूचा बर्फ बघायला जातात.





# दिवाळीत नवी रांगोळी शिकली नाही तर काय गंमत?

- आभा भागवत

"कोळम" हा दक्षिण भारतातील सुंदर रांगोळीचा प्रकार पालक आणि मुलांनी जरूर एकत्र काढावा असा आहे. ही रांगोळी ठिपके जोडून काढायची नसून ठिपक्यांच्या भोवती काढायची आहे. त्यामुळे त्यातली वळणं, रेघा, रेघांची दिशा आणि संपूर्ण रांगोळी हात न उचलता काढणं अशी अनेक आव्हानं एकत्र पेलायची असल्यामुळे मेंदूला पुरेसं खाद्य मिळतं आणि सर्वजण त्यात रमून जातात.











कागद आणि पेन्सिल हातात घ्या आणि हात न उचलता निदान चार रांगोळ्या तरी काढून बघा. मुलांना ठिपके काढून द्या आणि बाजूने रांगोळी काढायला प्रोत्साहन द्या. रांगोळी जमली नाही म्हणून निराश होऊ नका. प्रयत्न करत रहा. नक्की जमेल.






चिकूPiku.com
Fun & Learning

# मुलांना आवडेल अशी दिवाळी भेट

आपल्या मित्र-परिवारातील छोट्या दोस्तांना चिकूपिकूचा दिवाळी अंक भेट द्या. गोष्टी आणि Activitiesची दिवाळी साजरी करा.

## चिकूपिकू मासिकाची वार्षिक वर्गणी

~~₹1100/-~~ ₹999/-

(११ अंक) प्रत्येक महिन्याला एक अंक घरपोच




नवी गोष्ट, नवा खेळ, नवी Activity मुलांच्या मेंदूतील न्युरॉन्सची जोडणी करत असते. चिकूपिकूचा प्रत्येक अंक मुलांच्या डोक्यात भरपूर आणि चांगल्या जोडण्या घडवून आणेल.

**- डॉ. श्रुती पानसे (Ph.D - Early Brain-based Learning)**

**(Editor of Chiku-Piku)**

## मुलांसोबत वाचा, मुलांसमोर वाचा, मोठ्याने वाचा!



ऑनलाईन खरेदीसाठी www.chikupiku.com +91 91721 36478

